राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे खुटाळवाडी (ता.शाहुवाडी, जि.कोल्हापूर) नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पापुयो-२०१४/प्र.क्र.७०/पापु-१७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०७ ऑगस्ट, २०१४

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११०९/१०४(अ)/पापु-०७ दिनांक १७ मार्च २०१०.
२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर २०१३
३) ग्रा.पा.पु.योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै,२०१४
४) ग्रा.पा.पु.योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै,२०१४
५) मु.का.अ.जि.प.कोल्हापूर यांचे पत्र क्र. जिप /ग्रापापुवि /जिपास /वशि /२१०४, दिनांक ६ मार्च,२०१४

**प्रस्तावना:-**

मौजे खुटाळवाडी (ता.शाहुवाडी, जि.कोल्हापूर) नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन पत्र क्र. ५ अन्वये शासन मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर योजनेस अधिक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, पुणे यांनी दि. २५ फेब्रुवारी, २०१४ रोजी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. ग्रामसभेच्या मागणीनुसार जिल्हा परिषद कोल्हापूर यांचेकडून ५५ लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेची रु.९६,४३,४००/- इतक्या ढोबळ किंमतीची नळ पाणी पुरवठा योजना प्रस्तावित करण्यात आली आहे. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत ५५ लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या मौजे खुटाळवाडी (ता.शाहुवाडी, जि.कोल्हापूर) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रू. ४,५६३/- इतक्या वाढीव दरडोई खर्च असलेल्या रू. ९६,४३,४००/- (रूपये शहाण्णव लाख त्रेचाळीस हजार चारशे फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, ५५ लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या मौजे खुटाळवाडी (ता.शाहुवाडी, जि.कोल्हापूर) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रू. ४,५६३/- इतक्या वाढीव दरडोई खर्च असलेल्या रू. ९६,४३,४००/- (रूपये शहाण्णव लाख त्रेचाळीस हजार चारशे फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास शासन प्रशासकीय मान्यता देत आहे.

२. संदर्भ क्र. ३च्या शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी लोकवर्गणी पुर्णत: रद्द करण्यात आल्यामुळे सदर योजनेसाठी रू रू. ९६,४३,४००/- (रूपये शहाण्णव लाख त्रेचाळीस हजार चारशे फक्त) इतका शासन निधी उपलब्ध करून देण्यात येईल.

३. ५५ लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या मौजे खुटाळवाडी नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास खालील अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे

i) सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

ii ) योजनेची कामे विहीत पध्द्तीने निविदा मागविण्यात येऊन करावीत. जादा किंमतीच्या निविदा स्विकृत करण्यापूर्वी तसेच मंजूर दरापेक्षा जास्त दराने साहित्य (उदा. पाईप्स्) घेण्यापूर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी

iii) योजनेचे काम मंजूर किंमतीत कालबध्द व नियोजनबध्दरित्या पूर्ण करण्यात यावे. योजनेची कामे टप्प्या- टप्प्याने करावीत.

iv) योजना चालविण्याकरिता व देखभाल दुरूस्तीसाठी येणारा खर्च ग्रामपंचायत नाटोली यांनी योग्य ती पाणीपट्टी निश्चित करून भागवावा. त्यासाठी शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

v) संपूर्ण गाव हगणदारीमुक्त करण्यात यावे.

vi) कोणत्याही कारणाने खर्चात वाढ झाल्यास शासन अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

viii) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची व राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसंदर्भात शासनाने विहीत केलेल्या मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

४. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०५१४०१४००६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMBEKAR SURESH D

Digitally signed by AMBEKAR SURESH D
DN: CN = AMBEKAR SURESH D, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2014.08.07 13:43:25 +05'30'

**(सु.दे. आंबेकर)**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा. विधानसभा/ विधानपरिषद सदस्य
४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
६) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
७) जिल्हाधिकारी, कोल्हापूर
८) संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर
१०) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
११) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
१२) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पा.पु.व स्व.वि., यांचे स्वी.सहा. मंत्रालय, मुंबई.
१३) मुख्य अभियंता (ना व ग्रा ), म.जी.प्रा., ठाणे.
१४) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१५) अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, समन्वय व सनियंत्रण कक्ष, पुणे
१६) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, कोल्हापूर
१७) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, कोल्हापूर
१८) निवड नस्ती पापु-१७